**सार्वजनिक बांधकाम विभाग व विभागाच्या अधिनस्थ असलेल्या क्षेत्रिय कार्यालयांचे संकेतस्थळ अद्यावत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : सीओएम-२०२३/प्र.क्र.०२/ संगणक कक्ष**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ जुलै, २०२४.

**परिपत्रक :-**

सार्वजनिक बांधकाम विभाग व विभागाच्या अधिपत्याखाली येणाऱ्या क्षेत्रिय कार्यालयांचे संकेतस्थळ अद्यावत करण्याबाबत मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचेमार्फत समन्वय ठेवण्यात येते. सदर संकेतस्थळ वेळोवेळी अद्यावत करण्याच्या सूचना क्षेत्रीय कार्यालयांना संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे आणि मंत्रालय स्तरावरून देण्यात येतात. सदर संकेतस्थळ अद्यावत करण्याकरिता मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांची नियुक्ती केली आहे.

सार्वजनिक बांधकाम विभागाचे संकेतस्थळ www.mahapwd.com/www.mahapwd.gov.in येथील PWD Users -> RTI Information Upload या Option मध्ये माहिती अधिकार, अधिनियम २००५ अंतर्गत कलम ४ (१) (ख) ची माहिती सर्व संबधीत सा. बां. प्रादेशिक विभाग कार्यालये. सा. बां. मंडळ कार्यालये. सा. वा. विभाग कार्यालये व उपविभाग कार्यालये संवधीत कार्यालयाचा युसरनेम व पासवर्डचा वापर करुन त्यांचेमार्फत सदर प्रणालीमध्ये माहिती भरण्यात येते.

संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांनी संकेतस्थळ अद्यावत करण्याकरिता प्रत्येक विभागाच्या /कार्यालयाच्या आस्थापना यांना पासवर्ड व युजरआयडी देऊन आपल्या विभागाचे / कार्यालयाचे संकेतस्थळ अद्यावत करण्याबाबत कळविले आहे. परंतु संकेतस्थळ वेळोवेळी अद्यावत करत नसल्याचे दिसून येत आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाचे संकेतस्थळ अद्यावत करण्याबाबत राज्य माहिती आयोग यांनी दिलेल्या निर्देशानुसार क्षेत्रीय कार्यालयांची माहिती अद्यावत करण्यासंबंधी वेळोवेळी मंत्रालय स्तरावरून निर्देश देण्यात आले आहेत. तथापि, याबाबतच्या आदेशाचे पालन होताना दिसून येत नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे.

तसेच सदर संकेतस्थळ अद्यावत होत नसल्याने यासंबंधी मंत्रालय स्तरावर वारंवार तक्रारी व माहिती अधिकार अर्ज प्राप्त होत आहेत. यास्तव यासंबंधी तात्काळ कार्यवाही करणे

अनिवार्य आहे. तसेच सदर बाबत भविष्यात समस्या उद्भवल्यास, संबंधीत कार्यालय प्रमुख यांची सर्वस्वी जबाबदारी राहिल, याबाबत नोंद घेण्यात यावी.

सबब, सार्वजनिक बांधकाम विभागाअंतर्गत जनतेच्या सोयीसाठी तसेच विभागाची कार्यक्षमता उंचवण्यासाठी सदर परिपत्रकाव्दारे सर्व क्षेत्रिय कार्यालयांना पुनःश्च संकेतस्थळ अद्यावत करण्याबाबत निर्देशीत करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७०५११४१०२२५१८ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

YOGESH DNYANDEV ERANDE

Digitally signed by YOGESH DNYANDEV ERANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=cf3dc2714a32d7fafd0cd2d841042fc4e36724a895bdfda47de73434a5a62d4b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5DB79DC6E79A8BFCC4BF3AC79E55E47AB2E4890DBD9FEFCDE8F24C71CD428729, cn=YOGESH DNYANDEV ERANDE
Date: 2024.07.05 11:52:34 +05'30'

**( योगेश एरंडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, (सार्वजनिक बांधकाम विभाग), यांचे स्वीय सहायक.
२) सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
३) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
४) सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
५) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
६) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सह सचिव, (प्रशासन) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
८) निवडनस्ती (संगणक कक्ष) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.